**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग
क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.८०/१८-अ
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ३ डिसेंबर, २०१६

<u>संदर्भ</u>:-१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४/१२, दि.२५ मे, २००६
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक. संकीर्ण १८१४/प्र.क्र.७६/१८अ दि. ९ सप्टेंबर, २०१४

## <u>कार्यालयीन आदेश</u>

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ अधिनियमातील कलम ९(१)(२) मधील तरतूदीस अनुसरुन शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३ मधील नियम ४ व नियम ६ अनुसार कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करण्यासाठी दिनांक ९ सप्टेंबर, २०१४ रोजी शासन आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. तसेच पंतप्रधान पारितोषिक विजेते व राष्ट्रीय ई-गव्हर्नस यांचे राज्यात अनुकरण करण्याबाबतची कार्यवाही व केंद्र शासनाच्या कार्मिक एवं प्रशासकीय सुधार मंत्रालयातर्फे आयोजित र.व का. अधिकाऱ्यांच्या विविध राज्यातील दोऱ्यासाठी राज्यातील अधिकाऱ्यांच्या शिफारशी व असा दौरा महाराष्ट्रात असेल तर तद्संबंधी व्यवस्था व कार्यक्रम आखणी व प्रशासकीय सुधारणा अंतर्गत शासकीय सोयी सुविधाकरिता शपथपत्राऐवजी स्वघोषणा व कागदपत्रांच्या स्वयंसाक्षांकित प्रती स्वीकारणेबाबत व मध्यवर्ती टपाल केंद्र स्थापन करणेबाबत या विषयाबाबत खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे कार्यासनातील विषय व त्यांचे सादरीकरणांचे स्तर निश्चित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | विषय | सादरीकरणासाठी अधिका-यांचे स्तर | | |
|---|---|---|---|---|
| | | पहिला | दुसरा | तिसरा |
| १ | • पंतप्रधान पारितोषिक विजेते व राष्ट्रीय ई-गव्हर्नस यांचे राज्यात अनुकरण करण्याच्या दृष्टीने:<br>१. समन्वय अधिकारी नियुक्ती.<br>२. इतर विभागाकडून प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन केंद्र शासनास पाठविणे.<br>३. केंद्र शासनाच्या कार्मिक एवं प्रशासकीय सुधार मंत्रालयातर्फे आयोजित र.व का. अधिकाऱ्यांच्या विविध राज्यातील दोऱ्यासाठी राज्यातील अधिकाऱ्यांच्या शिफारशी व असा दौरा | अवर सचिव | उपसचिव | अपर मुख्य सचिव |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | महाराष्ट्रात असेल तर तद्संबंधी व्यवस्था व कार्यक्रम आखणी. | | | |
| २ | प्रशासकीय सुधारणा अंतर्गत:<br>१. शासकीय सोयी सुविधाकरिता शपथपत्राऐवजी स्वघोषणा व कागदपत्रांच्या स्वयंसाक्षांकित प्रती स्वीकारणेबाबत.<br>२. मध्यवर्ती टपाल केंद्र स्थापन करणेबाबत. | कक्ष अधिकारी | उप सचिव | अपर मुख्य सचिव |

३. वरील स्तराबाबत वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक क्र. २०१६१२०६१२२९३४६८०७ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Madhav Kale

Digitally signed by Madhav Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=27d9caf4774c398f91deb3963259cdc9f44838ca019c9c0bb02e4d9da740e6e1, cn=Madhav Kale
Date: 2016.12.06 12:32:36 +05'30'

**(माधव काळे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव(र.व का.) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
२) उप सचिव (र.व का.) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
३) अवर सचिव (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ३२
५) निवडनस्ती (का.१८ अ), मंत्रालय, मुंबई ३२